**समाजात प्रचलित असलेल्या अनिष्ट विधवा प्रथेचे निर्मुलन होणेबाबत .**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः व्हीपीएम- २०२२/प्र.क्र. १९२ /पं.रा.-३**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
मुंबई ४०० ००१.
तारीख: १७ मे ,२०२२

**<u>प्रस्तावना-</u>**

ग्रामपंचायत हेरवाड ता. शिरोळ जि. कोल्हापूर यांनी दि. ०५.०५.२०२२ रोजी मंजूर केलेल्या ग्रामसभा ठरावान्वये , समाजात प्रचलित असलेली अनिष्ट विधवा प्रथा बंद करणेबाबतचा ठराव सर्वानुमते मंजूर केला आहे. राजर्षी शाहू महाराज यांच्या स्मृती शताब्दी वर्षात त्यांच्या पुरोगामी विचारांचा वारसा जोपासत , सदर ग्रामपंचायतने केलेली ही कृती स्तुत्य आहे . आज विज्ञानवादी व प्रगतीशील समाज म्हणून आपण वाटचाल करत असलो तरीही , पतीच्या निधनावेळी पत्नीचे कुंकू पुसणे, गळ्यातील मंगळसूत्र तोडणे, हातातील बांगड्या फोडणे, पायातील जोडवी काढली जाणे यांसारख्या प्रथांचे समाजात पालन केले जात आहे . पतीचे निधन झाल्यानंतर त्याच्या पत्नीला विधवा म्हणून समाजात वावरत असताना अवहेलनेस सामोरे जावे लागते . या महिलांना त्यानंतर समाजात कोणत्याही प्रकारच्या धार्मिक व सामाजिक कार्यक्रमात सहभागी होवू दिले जात नाही . या कुप्रथांचे पालन होत असल्याने अशा व्यक्तींच्या प्रतिष्ठेने जीवन जगण्याच्या मानवी अधिकाराचे तसेच भारतीय संविधानाने बहाल केलेल्या समतेच्या हक्काचेही उल्लंघन होते . त्यामुळे अशा प्रथेचे निर्मुलन होणे ही काळाची गरज आहे .सदर बाबी लक्षात घेता , विधवा प्रथा निर्मुलन होणेच्या अनुषंगाने समाजात व्यापक जनजागृती होणे आवश्यक आहे. या अनुषंगाने ग्रामीण भागातील सर्व संबंधितांना निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

## शासन परिपत्रक -

आज २१ व्या शतकात वावरत असताना, विज्ञानवादी व प्रगतीशील समाज म्हणून आपण वाटचाल करत आहोत. मात्र , आजही समाजात विधवा प्रथेसारख्या अनिष्ट प्रथा प्रचलित असल्याचे

आढळून येते. पतीच्या निधनावेळी पत्नीचे कुंकू पुसणे, गळ्यातील मंगळसूत्र तोडणे, हातातील बांगड्या फोडणे, पायातील जोडवी काढली जाणे यांसारख्या कुप्रथांचे समाजात पालन केले जात आहे . या महिलांना त्यानंतर समाजात कोणत्याही प्रकारच्या धार्मिक व सामाजिक कार्यक्रमात सहभागी होवू दिले जात नाही . या कुप्रथांचे पालन होत असल्याने अशा व्यक्तींच्या प्रतिष्ठेने जीवन जगण्याच्या मानवी तसेच संविधानिक अधिकारांचे उल्लंघन होते . सदर महिलांना इतर महिलांप्रमाणे सन्मानाने जगण्याचा पूर्ण अधिकार आहे . यामुळे अशा प्रथेचे निर्मुलन होणे आवश्यक आहे .

सबब, या प्रथेचे पालन करणे अनुचित असून त्याबाबत समाजात व्यापक जनजागृती निर्माण करण्यात यावी . या प्रकरणी जनजागृती होणेच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करणेबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद ,सर्व यांनी आपल्या स्तरावरून सर्व अधिनस्त ग्रामपंचायत पदाधिकारी , अधिकारी व कर्मचारी यांना सूचित करावे .तसेच ,ग्रामपंचायत हेरवाड जि. कोल्हापूर यांनी केलेल्या ग्रामसभा ठरावा प्रमाणेच राज्यातील सर्व ग्रामपंचायतीना ठराव घेणेबाबत प्रोत्साहीत करावे . राजर्षी शाहू महाराज यांच्या स्मृती शताब्दी वर्षात त्यांच्या पुरोगामी विचारांचा वारसा पुढे नेण्याच्या दृष्टीने कृतीशील कार्यवाही करावी .

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202205121529595920 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JADHWAR SUHAS BAJIRAO

Digitally signed by JADHWAR SUHAS BAJIRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0de66b4d57847be117776aeaf9e53c5b70f1b8d7fdab972d3d1e2c6397e1faa5, pseudonym=CE8C7F6B15629677C7027D3F2FE5A809D3649E8F, serialNumber=F66717B05E42A313D9839BD11E491F5C5F850C51D1F3CB32930D359D7331FF36, cn=JADHWAR SUHAS BAJIRAO
Date: 2022.05.19 11:56:07 +05'30'

**( सुहास जाधवर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन .**

प्रत,

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री याचे प्रधान सचिव / सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव

५. मा. विरोधी पक्षनेते , विधानसभा / विधानपरिषद , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय , मुंबई

६. सर्व मा. विधानसभा , विधानपरिषद सदस्य व संसद सदस्य

७. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव

८. मा. अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक

९. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

१०. सर्व विभागीय आयुक्त

११. सर्व जिल्हाधिकारी

१२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१३. सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४. सर्व उपायुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय

१५. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) जिल्हा परिषद

१६. निवडनस्ती (कार्यासन पंचायत राज- ३)